**केंद्र शासनाच्या स्टँड अप इंडिया योजनेत "गोवारी" या विशेष मागास प्रवर्गातील नवउद्योजकांना सहाय्य करण्यासाठी मार्जिन मनी उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण-२०२४/प्र.क्र.०९(३)/योजना-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय (विस्तार), मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: १६ मे, २०२५.

**संदर्भ** :- १. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.आविमं-२०१९/प्र.क्र.१८/का.३, दिनांक २०.०६.२०१९
२. इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय समक्रमांक, दिनांक १५.१०.२०२४

**प्रस्तावना :-**

आदिवासी विकास विभागामार्फत अनूसूचित जमातींसाठी सुरु असलेल्या योजनांच्या धर्तीवर विशेष मागास प्रवर्गातील "गोवारी" समाज बांधवाच्या विकासासाठी विशेष कार्यक्रम वित्त विभागाच्या सहमतीच्या अधीन राहून राबविण्यास या विभागाच्या संदर्भाधिन दिनांक १५.१०.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदरहू विशेष कार्यक्रमांतर्गत विशेष मागास प्रवर्गातील "गोवारी" या समाजातील सवलतीस पात्र नवउद्योजक लाभार्थी यांना १५ टक्के मार्जिन मनी उपलब्ध करुन देण्याबाबत या योजनेच्या अंमलबजावणीसाठी विहीत कार्यपद्धती, योजनेच्या लाभार्थ्यांसाठी पात्रतेचे निकष व अटी विहीत करण्यासाठी मा. मंत्रिमंडळाच्या दिनांक २९/०४/२०२५ रोजीच्या बैठकीत निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुषंगाने सदर योजना राबविण्याची बाबा शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाच्या स्टँड अप इंडिया या योजनेअंतर्गत महाराष्ट्र राज्याच्या अनुसूचित जमातीच्या सवलती घेण्यास पात्र असलेला "गोवारी" या विशेष मागास प्रवर्गातील नवउद्योजक लाभार्थ्यांची मार्जिन मनी भरण्याची क्षमता नसल्यामुळे या नवउद्योजक लाभार्थ्यांना एकूण प्रकल्प किंमतीच्या लाभार्थी यांच्या हिश्श्यामधील २५ टक्के मधील जास्तीत जास्त १५ टक्के मार्जिन मनी उपलब्ध करुन देण्यास (Front End Subsidy) याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. या योजनेअंतर्गत महाराष्ट्र राज्यातील विशेष मागास प्रवर्गातील "गोवारी" या समाजातील सवलती घेण्यास पात्र असलेला नवउद्योजक यांनी १० टक्के स्वहिस्सा भरणा केल्यानंतर व बँकेने अर्जदारास स्टँड अप इंडिया योजनेंतर्गत ७५ टक्के कर्ज मंजूर केल्यानंतर उर्वरीत Front End Subsidy १५ टक्के राज्य शासनामार्फत देण्यात येईल.

२.१ सदर योजनेचा लाभ स्टँड अप इंडिया योजने अंतर्गत पात्र ठरलेल्या राज्यातील विशेष मागास प्रवर्गातील "गोवारी" या समाजातील सवलतीस पात्र लाभार्थ्यांना देण्यात येईल.

२.२ संबंधित लाभार्थ्यांनी सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण यांचेकडे परिशिष्ट "अ" मध्ये विहित विवरणपत्रात अर्ज सादर करणे आवश्यक आहे. अर्जासोबत उद्योग आधार नोंदणी पत्र, जात प्रमाणपत्र व बँकेचे कर्ज मंजूरीचे पत्र जोडणे आवश्यक आहे.

२.३ सदरची रक्कम सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण यांनी १५ दिवसांचे आत लाभार्थ्यांच्या कर्ज खात्यामध्ये (NEFT/RTGS) च्या माध्यमातून वितरीत करावी.

३. या योजनेंतर्गत लाभार्थी निवडीबाबत निर्णय घेण्यासाठी प्रत्येक जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| जिल्हाधिकारी | : | अध्यक्ष |
| मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | : | सदस्य |
| महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र | : | सदस्य |
| व्यवस्थापक, जिल्हा अग्रणी बँक | : | सदस्य |
| प्रादेशिक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण | : | सदस्य |
| सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण | : | सदस्य सचिव |

लाभार्थी निवडीबाबत अंतिम निर्णय घेण्यासाठी जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समितीकडे प्राप्त प्रस्ताव शासनास मान्यतेस्तव सादर करावेत. निधीची मागणी इतर मागास बहुजन कल्याण विभागाकडे सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण यांनी करावी.

४. उप सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण यांचेकडून निधीची मागणी प्राप्त झाल्यानंतर आवश्यक तो निधी संबंधित जिल्ह्यांच्या सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण यांना वितरीत करण्यात येईल. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी जिल्हा स्तरावर संबंधित सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. या योजनेकरीता नवीन लेखाशिर्ष घेण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल.

६. या योजनेचा वेळोवेळी आढावा घेण्यासाठी अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात येईल. या समितीमध्ये अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई, तसेच सिडबी (SIDBI) चे प्रतिनिधी यांचा समावेश असेल.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. सं. क्र. ०५/२०२५, दिनांक ११.०४.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहे. त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०५१६१६१३१६०९३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAHIL MAHADEV DHANWADE

Digitally signed by SAHIL MAHADEV DHANWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=393cd08ed02c7d151f264e32cdad83db848ccb3c33d5d6254e4ab7dc8c58b3b1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=080CFC4AB018C3B658C71325006154CA250D25A3B8F476AC4EE4C2BD9C4CD79A, cn=SAHIL MAHADEV DHANWADE
Date: 2025.05.16 16:14:59 +05'30'

**(साहिल धनवडे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा. सभापती, विधान परिषद यांचे खाजगी सचिव.

३. मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव.

४. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

५. मा.उपमुख्यमंत्री (नगरविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे खाजगी सचिव.
८. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव.
९. मा.विरोधी पक्षनेते, विधान परिषद / विधानसभा यांचे खाजगी सचिव.
१०. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव / उप सचिव.
११. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अपर मुख्य सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. जिल्हाधिकारी (सर्व).
१७. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१८. महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र.
१९. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२०. सर्व प्रादेशिक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग.
२१. सर्व सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण.
२२. महालेखापाल - १/२ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर.
२३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२४. उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२६. निवडनस्ती (योजना-३).

**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२४/प्र.क्र.०९(३)/योजना-३, दिनांक: १६ मे ,२०२५ सोबतचे परिशिष्ट "अ"**

Affix A Passport size Photo and sign Across it

| | | |
|---|---|---|
| 1 | Name of the Applicant | |
| 2 | Caste certificate of Special Backward Caste (Govari caste) | |
| 3 | Name of the Firm | |
| 4 | Constitution of the Firm (Sole Proprietor / Partnership Firm / LLP / Private Limited Co. etc.) | |
| 5 | Address of the Firm | |
| 6 | PAN | |
| 7 | Aadhaar No. of the Applicant | |
| 8 | Total Project Cost | |
| 9 | Calculate 15% Subsidy Amount (15% of the Total Project Cost) | |
| 10 | Name of the Bank and Branch | |
| 11 | Bank Loan Sanction Letter No.<br><br>(Enclose a True Copy) | |
| 12 | Bank's Subsidy Account Details :- | |
| | Accout Name | |
| | Bank Branch | |
| | Current Account No. | |
| | IFSC Code | |

**Applicant's Signature**